**नागपूर महानगरपालिकेची मौजा वाठोडा येथील १८.३५ हेक्टर जागा श्री विलेपार्ले केळवणी मंडळ, मुंबई या संस्थेस ३० वर्षांकरीता भाडेतत्त्वावर देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक:- नामपा - ११२४/ प्र.क्र. ४५/नवि-२६
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
४ था मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १६ मार्च, २०२४.

**संदर्भ :-** (१) आयुक्त तथा प्रशासक, नागपूर महानगरपालिका, नागपूर यांचे पत्र क्र.२१६/कार्य.अभि.(प्रकल्प), दिनांक ११ मार्च, २०२४ .
(२) महानगरपालिका प्रशासकीय ठराव क्र. ४४१, दि.२८ जून, २०२३.
(३) महानगरपालिका प्रशासकीय ठराव क्र. २३, दि.०५ जानेवारी, २०२४.
(४) महानगरपालिका प्रशासकीय ठराव क्र. ५६, दि.११ मार्च, २०२४.

**प्रस्तावनाः-**

नागपूर महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्रमांक ४४१, दिनांक २८ जून, २०२३ अन्वये मौजा वाठोडा येथील १८.३५ हे. जागेवर नर्सरी ते उच्च शिक्षण देण्याऱ्या उच्च दर्जाची शैक्षणिक संस्था विकसित करण्याबाबत मंजूरी देण्यात आली. महानगरपालिका ठराव क्र. २३, दि. ०५ जानेवारी, २०२४ द्वारे महानगरपालिकेने नर्सरी ते उच्च माध्यमिक शाळा तसेच उच्च शिक्षणचे वैशिष्ठपूर्ण पाठयक्रम (मुख्यत्वे : प्रबंधन) चे शिक्षण देण्यासाठी नागपूर येथे आंतरराष्ट्रीय दर्जाची शैक्षणिक संस्था उभारण्याबाबत निर्णय घेतला.

२. या अनुषंगाने आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांनी नागपूर महानगरपालिकेची मौजा वाठोडा येथील १८.३५ हेक्टर "सार्वजनिक संस्थेसाठी" आरक्षित असलेली जागा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ७९ (ग) मधील तरतुदींनुसार (बाजारमुल्या पेक्षा कमी दराने) भाडेतत्त्वावर निविदाकार श्री विलेपार्ले केळवणी मंडळ यांना देण्याकरीता शासनाची मान्यता प्राप्त होण्याकरीता प्रस्ताव सादर केला आहे. यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

१. राज्य शासनाने दि.०६ नोव्हेंबर, २०२३ रोजी महाराष्ट्र महानगरपालिका (स्थावर मालमत्तेचे भाडेपट्ट्याद्वारे हस्तांतरण आणि भाडेपट्ट्याचे नुतनीकरण) नियम, २०२३ प्रसिद्ध केले आहे. यामधील नियम ३ नुसार आयुक्त, महानगरपालिका यांच्या अध्यक्षतेखाली "भाडे व सुरक्षा ठेव निर्धारण समिती" गठीत करण्यात आली आहे. या समितीस वार्षिक भाडेपट्टा निश्चित करण्याचे अधिकार

देण्यात आले आहेत. यातील नियम ३(२)(क) नुसार आवश्यक असल्यास संबंधित महानगरपालिका, समितीच्या शिफारशीसह शासनाच्या मान्यतेने शैक्षणिक व धर्मादाय प्रयोजनाकरीता भाडेपट्ट्याने दिलेल्या मालमत्तेबाबत कमी दराची आकारणी करु शकेल किंवा सूट देवू शकेल असा नियम करण्यात आला आहे.

२. आयुक्त, नागपूर महानगरपालिका हे भाडे व सुरक्षा ठेव निर्धारण समितीचे अध्यक्ष असल्याने आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांनी सादर केलेल्या प्रस्तावास भाडे व सुरक्षा ठेव निर्धारण समितीची शिफारस गृहित धरण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ७९ (ग) मधील तरतुदींन्वये प्राप्त अधिकारानुसार आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांच्या मागणीप्रमाणे नागपूर महानगरपालिकेच्या मालकीची मौजे वाठोडा येथील “सार्वजनिक संस्थेसाठी” आरक्षित १८.३५ हेक्टर जागा निविदाकार श्री विलेपार्ले केळवणी मंडळ, मुंबई या संस्थेस नाममात्र रु.१ प्रती चौ.फुट प्रती वर्ष या दराने प्रथमतः ३० वर्ष कालावधीकरीता भाडेपट्ट्याने देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०३१६१३४७१९४४२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2024.03.16 13:56:38 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री (गृह व विधि व न्याय) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त तथा प्रशासक, नागपूर शहर महानगरपालिका, नागपूर.
६. निवडनस्ती (नवि-२६).